तिच्यावर एकामागें एक अशा चारी भावंडांच्या संगमरवरी मूर्ति असून समोरच्या कोनाड्यांत चांगदेव हात जोडून, माथा नमवून बसलेला आहे. खरें म्हणजे या मूर्ति किशोरवयाच्या हव्या होत्या; पण त्या चाळिशीच्या घरांतल्या दिसतात. मुक्ताबाई सर्वांत धाकटी; पण ती तर



ज्ञानेश्वरांनीं चालवलेली भिंत

चार मुलांच्या आईसारखी पोक्त, स्थूल आहे. भिंतीशेजारींच भैरवाचें देऊळ आहे.

एका वारीच्या वेळीं माझे मित्र कवि श्री. बोरकर माझ्या समागमें होते. आम्हीं भैरवाच्या सभामंडपांतल्या स्वच्छ फरशावर दान तास बसून ज्ञानेश्वरांच्याविषयीं सुखसंवाद केला होता.

ज्ञानेश्वर हे रसेश्वरही होते. ज्ञानेश्वरींत सगळ्या रसांना त्यांनीं शांतरसाच्या घरीं पाहुणेर दिला आहे आणि हें सगळें टीचभर ओवी-वृत्तांत. एवढयाशा साडेतीन चरणी वृत्तांत निकराचें तत्त्वज्ञान आणि परतत्त्वाला स्पर्श करणारें अप्रतिम काव्य ओतून त्यांनीं त्या वृत्तावर 'ओवी ज्ञानेशाची' असा छाप उठवून ठेवला आहे. याच ओवीचा पुढें नाथ, मुक्तेश्वर, श्रीधर इत्यादि संतकवींनीं आधार घेतला आणि घरोघर स्त्रियांनींही. महाराष्ट्राची संस्कृति ओवींतून अभिव्यक्त झाली

आहे असें म्हटल्यास ती अतिशयोक्ति नव्हे. संस्कृतांत अनुष्टुभाला जें प्राधान्य तेंच मराठींत ओवीला.

ज्ञानेश्वरांनीं मुमुक्षु साधकांसाठीं ज्ञानेश्वरी लिहिली, स्वानुभवी परमहंसांसाठीं अमृतानुभव रचला आणि जाणते-अजाणते या सर्वांसाठीं हरिपाठ निर्मिला. अशा प्रकारें ज्ञानेश्वर सर्वांचे कल्याणकर्ते झाले. तत्त्ववेत्त्या पुरुषांनीं तर्काच्या बळावर अद्वैतापर्यंत मजल मारली; पण तें अद्वैत शुष्क होतें, नीरस होतें. ज्ञानेश्वरांनीं त्यांत भक्ति-प्रेम ओतलें. बुद्धि आणि हृदय दोघांचेंही त्यामुळें समाधान साधलें. त्यांच्या चरित्रांत काय, किंवा ग्रंथांत काय, विश्वप्रेमाचा महासागर भरलेला आहे. त्यांनीं ज्ञानाला द्राक्षारसांत बुडविलें आणि भक्तीला ज्ञानाचे डोळे जडवले. जग सत्य का मिथ्या असल्या शुष्क वादांत ते पडले नाहींत. भूतमात्रीं एकच श्रीहरि नांदतो आहे आणि तोच सर्वभावें सेव्य आहे हें त्यांनीं आळवून सांगितलें आहे.

**' भूतां परस्परें जडो । मैत्र जीवाचें '**

हेंच विश्वधर्माचें रहस्य त्यांनीं प्रगट केलें आहे.

आणि म्हणूनच त्याची वाणी स्वादु, मधु झाली आहे. त्यांचें अलौकिकपण दिसेपर्यंत समाजानें त्यांना अत्यंत तिरस्कारानें वागवलें. समाजाकडून ज्यांचा छळ होतो त्यांची वाणी बहुधा तुसडी होते, विषमय बनते. पण ज्ञानेश्वरांच्या वाणींत तसल्या दुर्गुणांचा वास-वाराही नाहीं. ते शांत, प्रसन्न वृत्तीनें आपलें तत्त्वज्ञान प्रतिपादितात. त्यांनीं समाजाला क्षमा तर केलीच; पण ती केल्याची जाणीवसुद्धां उरूं दिली नाहीं. ' अनाक्रोश क्षमा ' म्हणतात तें हिलाच. जगातले कित्येक ' धर्मस्थापनेचे नर ' ही क्रोधाला वश झालेले दिसतात. मतप्रस्थापकही आदळआपट करतांना आढळतात; पण ज्ञानेश्वर मात्र कोणाला ' दुवाळी ' होणार नाहीं, कोणाची ' भवई ' उचलणार नाहीं अशा मृदुतेनें सर्वत्र बोलले आहेत. जीवातळीं जीव आंथरून राहिले आहेत. इतरांनीं शब्दचर्चा, अर्थचर्चा केली. खंडन-मंडनासाठीं दंड थोपटले. पण ज्ञानेश्वरींत असला खटाटोप नाहीं. त्यांचें विवेचन

मावार्द्र, निर्मळ आणि अनुभवाचें आहे. म्हणूनच तें धर्मप्रवचन, धर्मसंकीर्तन वाटतें. वारकरी तर ज्ञानेश्वरीला 'माउली' म्हणून शिरीं धरतातच; पण सुबुद्ध महाराष्ट्रानेंहि तिचा आदर करायला हवा. विवेचकपणें, सूक्ष्मपणें तिचा अभ्यास करायला हवा. ज्ञानेश्वरांना विसरणें म्हणजे आईला विसरण्यासारखें आहे आणि आईला विसरणें म्हणजे 'ाणुसकीला पारखें होणें हें ओघानेंच आलें.

———